दि. २६ नोव्हेंबर हा दिवस “संविधान दिन” म्हणून दरवर्षी साजरा करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,

शासन परिपत्रक क्रमांक : बैठक-२०१५/प्र.क्र.३८७/बांधकामे

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२

दिनांक : २२ नोव्हेंबर, २०१६

वाचा :-

१) शासन परिपत्रक, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.सान्यावि-२०१५/प्र.क्र.३५७/बांधकामे, दि.६ नोव्हेंबर, २०१५

२) केंद्र शासनाचे पत्र क्र D.O.No.19022/16/2016-SCD.VI, Dated 15/11/2016

**शासन परिपत्रक :-**

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंतीचे औचित्य साधून दि.२६ नोव्हेंबर, २०१५ हा दिवस “संविधान दिन” म्हणून राज्यामध्ये मध्ये मोठ्या प्रमाणावर साजरा करण्यात आला. या संदर्भात मा.मंत्री सामाजिक न्याय यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ३ नोव्हेंबर, २०१५ रोजी सर्व संबंधितांची बैठक आयोजिक करण्यात आली होती. सदरहू बैठकीमध्ये मा.मंत्री यांनी दिलेल्या निर्देशांच्या अनुषंगाने संदर्भ क्र.१ येथील दि.६ नोव्हेंबर, २०१५ च्या परिपत्रकान्वये दिनांक २६ नोव्हेंबर हा दिवस “संविधान दिन” म्हणून साजरा करण्याबाबत सर्व संबंधित प्रशासकीय विभागांना सूचना देण्यात आल्या आहेत.

२. आता केंद्र शासनाने त्यांच्या दिनांक १५ नोव्हेंबर, २०१६ च्या पत्रान्वये राज्य शासनास कळविले आहे की, दि. २६ नोव्हेंबर या “संविधान दिनी” संविधानाच्या उद्येशिकेचे वाचन सर्व शासकीय कार्यालये, महामंडळे, शाळा, महाविद्यालये इ. ठिकाणी करण्यात यावे तसेच वादविवाद स्पर्धा, निबंध स्पर्धा आयोजित करण्यात याव्यात व विद्यापीठामधून विशेष व्याख्यानांचेही आयोजन करण्यात यावे. त्यानुसार खालीलप्रमाणे सुचना देण्यात येत आहेत.

१) उपरोक्त संदर्भ क्र. २ च्या पत्रान्वये केंद्र शासनाने दिनांक २६ नोव्हेंबर हा दिवस “संविधान दिन” म्हणून संपूर्ण देशामध्ये साजरा करावयाचे घोषित केलेले असून, त्या अनुषंगाने सदर कार्यक्रम राज्यात मोठ्या प्रमाणात राबविण्याबाबत सामान्य प्रशासन विभागाने राज्यातील सर्व जिल्हाधिकारी, सर्व स्थानिक स्वराज्य संस्था, सर्व शासकीय-निमशासकीय कार्यालये यांना योग्य त्या सविस्तर सूचना निर्गमित कराव्यात.

२) “संविधान दिन” या कार्यक्रमात राज्यातील सर्व प्राथमिक / माध्यमिक शाळेतील व महाविद्यालयांतील विद्यार्थ्यांना सहभागी करुन संविधानाच्या उद्येशिकेचे समुह वाचन करण्याबाबत शालेय शिक्षण विभागाने व उच्च तंत्र व शिक्षण विभागाने योग्य त्या सूचना सर्व संबंधितांना द्याव्यात.

३) राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्था अंतर्गत सर्व जिल्हा परिषदा, पंचायत समित्या व ग्रामपंचायती यांच्यामार्फत जनसमुदायाकडून संविधानाच्या उद्देशिकेचे समुह वाचन करण्याबाबत च्या सूचना ग्रामविकास विभागाने सर्व जिल्हा परिषदांना द्याव्यात. तसेच दिनांक २६ नोव्हेंबर या संविधान दिनाच्या दिवशी सर्व ग्रामपंचायतस्तरावर विशेष ग्रामसभा आयोजित करण्यात येऊन त्यावेळी संविधानाच्या उद्देशिकेचे वाचन करण्याबाबत आवश्यक त्या सूचना देण्यात याव्यात.

४) महानगरपालिका व नगरपालिका/ नगर परिषदा यांच्यामार्फत जनसमुदायाकडून संविधानाच्या उद्देशिकेचे समुह वाचन करण्याबाबत नगर विकास विभागाने सर्व संबंधित महानगर पालिका, नगरपालिका/नगर परिषदांना सूचना द्याव्यात.

५) राज्यातील सर्व पोलिस ठाणे इत्यादी ठिकाणी “संविधान दिन” साजरा करावयाचा असून राज्यातील सर्व पोलिस ठाण्यामध्ये सदरचा कार्यक्रम राबविण्याबाबत गृह विभागाने सविस्तर सूचना सर्व संबंधितांना द्याव्यात.

६) सर्व विद्यापीठांमार्फत “संविधान दिना” निमित्त संविधानाच्या उद्देशिकेच्या वाचनाचा कार्यक्रम घेण्याबाबत तसेच निबंध स्पर्धा/वादविवाद स्पर्धा आयोजित करण्याबाबत व संविधानाबाबत विशेष व्याख्याने आयोजित करण्याबाबत सर्व विद्यापीठे व त्यांच्या अंतर्गत सर्व महाविद्यालयांना उच्च व तंत्र शिक्षण विभागाने सूचना द्याव्यात.

सदरहू शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०१६११२२१७०८२५३५२२ असा आहे. हा आदेश डिजीडल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justic and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d81b5c910bad5837d7f88ac97a75b312f0e5744ecbdc45b7704dcb27f5d4dfef, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2016.11.23 12:13:00 +05'30'

(अनिल आहिरे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. विरोधी पक्ष नेता, विधान सभा, विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई.
४) सर्व सन्माननीय संसद सदस्य, विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
५) अप्पर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग (र.व.का.) मंत्रालय, मुंबई.
६) अप्पर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

८) प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९) प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०) प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
१३) मा. मंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य यांचे खाजगी सचिव
१४) मा. राज्यमंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य यांचे खाजगी सचिव
१५) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, पुणे.
१६) सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण
१७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१८) निवडनस्ती, कार्यासन-बांधकामे, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मुंबई.